आरोग्य सेवा संचालनालयाच्या अधिपत्याखालील जिल्हा सामान्य रुग्णालय, नंदूरबार वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाकडे पूर्णत: हस्तांतरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : एमईडी २०१३/प्र.क्र. २०९/१३/शिक्षण १**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,
९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१,
दिनांक : ०९ जानेवारी, २०१९.

**वाचा** :
१) शासन निर्णय क्र. एमईडी-२०१०/प्र.क्र.७६ (अ)/१०/शिक्षण १, दि. ३१.०१.२०१२.
२) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचे पत्र क्र. संवैशिवसं/शावैमनंदूरबार/ साआवि/सा.क./८९१९/अ-५/२०१८, दि. २४.०८.२०१८

**प्रस्तावना :**

नंदूरबार येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व ५०० रुग्णखाटांचे संलग्न रुग्णालय निर्माण करण्याबाबतचे आदेश संदर्भ क्र. १ अन्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत. सदर नियोजित शासकीय वैद्यकीय महाविद्यालय प्रत्यक्षात सुरू होण्यापूर्वी भारतीय आयुर्विज्ञान परिषदेच्या निकषांची पूर्तता करण्याच्या दृष्टीने नंदूरबार येथील आरोग्य सेवा संचालनालयाच्या अधिपत्याखालील जिल्हा सामान्य रुग्णालय, नंदूरबार वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाकडे हस्तांतरीत करण्याचे संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांनी संदर्भाधीन क्र. २ च्या पत्रान्वये प्रस्तावित केले आहे. तद्नुसार नंदूरबार येथील जिल्हा सामान्य रुग्णालय संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचेकडे हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

नंदूरबार येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाची विद्यार्थी प्रवेश क्षमता १०० निश्चित करण्यात आली असून, या संदर्भात भारतीय आयुर्विज्ञान परिषदेच्या निकषांची पूर्तता करण्याकरिता या शासन निर्णयासमवेतच्या परिशिष्टामध्ये दर्शविलेल्या कार्यपध्दतीनुसार व अटी शर्तीनुसार, आरोग्य सेवा संचालनालयाच्या अधिपत्याखालील जिल्हा सामान्य रुग्णालय, नंदूरबार हे नियोजित शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नंदूरबार यांच्याकडे हस्तांतरित करण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारीक संदर्भ क्र.५६/२०१८/आरोग्य-३, दिनांक १७.११.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०९१६०३२७७६१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrinivas P. Kotwal

Digitally signed by Shrinivas P. Kotwal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education And Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d32b061d22e577cf43207f6a86cadc4ce1798644845edd3b3fb5ef54c3051c62, cn=Shrinivas P. Kotwal
Date: 2019.01.09 16:56:30 +05'30'

(डॉ. श्रीनिवास कोतवाल)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत, माहिती व उचित कार्यवाहीस्तव अग्रेषित

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री, वैद्यकीय शिक्षण, यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य विभाग, यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई.
७) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८) संचालक, सार्वजनिक आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक.
१०) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नंदूरबार.
११) जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा सामान्य रुग्णालय, नंदूरबार.
१२) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, नंदूरबार.
१४) सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व संलग्नित रुग्णालये
१५) सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवडनस्ती (शिक्षण-१)

**वैद्यकीय शिक्षण आणि औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्रमांक एमईडी-२०१३/ प्र.क्र.२०९/१३/शिक्षण-१, दिनांक ०९ जानेवारी, २०१९ सोबतचे**

## परिशिष्ट

१) जिल्हा रुग्णालय व रुग्णालयाच्या परिसराची सर्व जागा ही जरी हस्तांतरीत झाली तरी इमारत व जागेचा ताबा हे जिल्हा शल्य चिकित्सक यांचे नावावरच राहील. त्यात कोणताही बदल होणार नाही.

२) जिल्हा शल्य चिकित्सक, हे तेथील नवनियुक्त अधिष्ठाता यांचेबरोबर करार करतील व सदर करार हा फक्त ३ वर्षाच्या कालावधीकरिता असेल त्यानंतर तो आपोआप संपुष्टात येईल. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने ३ वर्षाच्या आत महाविद्यालय स्थापित करुन भारतीय आयुर्विज्ञान परिषदेच्या मानकानुसार वैद्यकीय महाविद्यालय रुग्णालय स्थापन करण्याची कार्यवाही पूर्ण करावी व करार संपण्याचे दिवशी रुग्णालय सार्वजनिक आरोग्य विभागास चल अचल मालमत्ता तथा प्रतिनियुक्तीच्या पदांसह परत करावे.

३) रुग्णालय इमारतीमधील सुमारे ५००० चौ.फुट जागा ही जिल्हा शल्य चिकित्सक, कार्यालय, प्रशासकीय कार्यालय इत्यादी साठी व ५००० चौ. फुट जागा औषध भांडार यासाठी अशी एकूण १०,००० चौ.फुट क्षेत्र सार्वजनिक आरोग्य विभागाकडेच ठेवण्यात येईल. जिल्हा शल्य चिकित्सक त्यांच्या पसंतीने (सोईनुसार) या दोन कारणांसाठी जागेची निवड करतील. रुग्णालय इमारती मधील व परिसरातील उर्वरीत सर्व जागा करार चालू असेपर्यत अधिष्ठाता, वैद्यकीय महाविद्यालय यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली राहील.

४) अधिष्ठाता, वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय यांना इमारतीच्या मूळ रचनेत काही फेरफार करावयाचे असतील तर त्यांनी सार्वजनिक आरोग्य विभागाची (प्रशासनिक विभाग) यांची पूर्व परवानगी घेणे आवश्यक राहील. आवश्यकतेनुसार भारतीय आयुर्विज्ञान परिषदेच्या परवानगीसाठी त्यांच्या मानकांप्रमाणे रुग्णालय इमारतीमधील फेरबदल करणे आवश्यक असल्यास जिल्हा शल्य चिकित्सक यांचेमार्फत शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करुन तसा प्रस्ताव शासनास सादर केला जाईल व शासनाची परवानगी प्राप्त झाल्यानंतरच फेरबदल केले जातील.

५) सध्या जिल्हा शल्य चिकित्सक यांचे कार्यालयाचा आहरण व संवितरण अधिकारी हा जिल्हा शल्य चिकित्सक यांचे अखत्यारीत सार्वजनिक आरोग्य विभागाकडेच राहील.

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने त्यांचेसाठी स्वतंत्र आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त करावा. जिल्हा शल्य चिकित्सक यांचा आहरण व संवितरण अधिकारी हा जिल्हा शल्य चिकित्सक यांच्या अखत्यारीत असणाऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहील. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने नियुक्त केलेला आहरण व संवितरण अधिकारी हा जिल्हा शल्य चिकित्सक यांचा जो अधिकारी व कर्मचारी वर्ग वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाकडे प्रतिनियुक्तीने कार्यरत असेल, त्याचा आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहील.

६) नेत्र विभाग व फिरते नेत्र पथक (मोबाईल ऑप्थॅल्मीक युनिट) हे पूर्वीप्रमाणेच जिल्हा शल्य चिकित्सक यांचे अखत्यारीत राहील, त्यांचे हस्तांतरण होणार नाही. अधिष्ठाता यांच्या नियंत्रणाखाली भारतीय आयुर्विज्ञान परिषदेच्या मानकाप्रमाणे स्वतंत्र नेत्र चिकित्सा शास्त्र विभाग, शासकीय महाविद्यालय यांचेकडे राहील व ते स्वत: अधिष्ठाता यांच्या नियंत्रणाखाली काम पाहतील. जिल्हा शल्य चिकित्सक यांच्या अंतर्गत असणारे नेत्र विभाग व फिरते नेत्रपथक व अधिष्ठाता यांच्या अंतर्गत असणारा नेत्र शल्य चिकित्सा शास्त्र विभाग राष्ट्रीय अंधत्व निवारण कार्यक्रम हे समन्वयाने राबवतील.

७) अपंगत्व तपासणी मंडळ गट अ व गट ब अधिकाऱ्यांसाठीची वैद्यकीय मंडळे पूर्वीप्रमाणेच जिल्हा शल्य चिकित्सक यांचे अखत्यारीत राहतील. जिल्हा शल्य चिकित्सक यांनी गट क व गट ड कर्मचाऱ्यांसाठी वैद्यकीय प्रमाणपत्र देताना विशेषज्ञांच्या अभिप्रायाची आवश्यकता भासल्यास अधिष्ठाता यांच्या अधिपत्याखालील नेत्र रोग शल्य चिकित्सा शास्त्रक, अस्थिव्यंगोपचार शास्त्र, कान, नाक व घसा शास्त्र, औषधी वैद्यकशास्त्र, मानसोपचार शास्त्र इत्यादी विभागातील तज्ञ त्यांना तांत्रिक तज्ञ अभिप्राय मागणीप्रमाणे व आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन देतील.

८) सर्व कायदेशीर बाबीसाठी उदा. Pre-Conception and Pre-Natal Diagnostic Techniques (PCPNDT), Medical Termination of Pregnancy (MTP), Family Planning, Medical Negligence, Epidemic Act व इतर तत्सम समित्यासाठी जिल्हा समुच्चित प्राधिकारी हे जिल्हा शल्य चिकित्सक राहतील.

९) अतिरिक्त जिल्हा शल्य चिकित्सक हे प्रतिनियुक्तीने अधिष्ठाता यांचे प्रशासकीय नियंत्रणाखाली वैद्यकीय अधिक्षक म्हणून रुग्णालयाचे कामकाज पाहतील.

१०) नवीन वैद्यकीय महाविद्यालय कार्यान्वित करण्यासाठी वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने वैद्यकीय महाविद्यालयासाठी नव्याने लेखाशिर्ष व त्याखाली निधी उपलब्ध

होईपर्यत स्वतंत्ररीत्या वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने निधी उपलब्ध करुन द्यावा.

११) सार्वजनिक आरोग्य विभाग व वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांमध्ये आपसी सामंजस्य करारनामा झाल्यानंतर सुरक्षा, स्वच्छता, वस्त्र धुलाई, आहार या सेवा वैद्यकीय महाविद्यालयामार्फत सुरु करण्यात याव्यात. सध्या रुग्णालयात उपलब्ध असलेल्या अवैद्यकीय सेवा चालू ठेवण्याबाबत अधिष्ठाता निर्णय घेतील. अवैद्यकीय सेवा चालू ठेवावयाच्या असतील तर त्याचे नियंत्रण व देयके यांची जबाबदारी अधिष्ठाता यांची राहील.

१२) सदरहु रुग्णालयातील उपलब्ध यंत्रसामग्री व जड वस्तुसंग्रह आहे त्या स्थितीत वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय यांना वर्ग करण्यात येईल. यापुढे त्यावरील दुरुस्ती व देखभालीचा खर्च संबंधित वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय यांनी त्यांचे निधीतून भागवावा. या संदर्भात सार्वजनिक आरोग्य विभागाकडे निधीची मागणी करता येणार नाही.

१३) स्पेशल न्यु बॉर्न केअर युनिट, डायलेसीस आणि डीआयसीई हे राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत असल्याने या सुविधांसाठीचा नियमित तांत्रिक कर्मचारी वर्ग वैद्यकीय महाविद्यालयाचा असेल तर प्रशासकीय नियंत्रण जिल्हा शल्य चिकित्सक यांचे राहील.

१४) हस्तांतरणाच्या दिवशी जिल्हा रुग्णालय व स्त्री रुग्णालयामध्ये उपलब्ध असलेला औषधाचा साठा वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाकडे हस्तांतरीत करण्यात येईल व रुग्णालय हस्तांतरीत झाल्यानंतर रुग्णालयातील औषधी व कंझ्युमेबल उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी ही वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाची राहील.

१५) गट-अ मधील एम.बी.बी.एस. अर्हताप्राप्त वैद्यकीय अधिकारी यांच्या सेवा वैद्यकीय महाविद्यालयाकडे नियमानुसार प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येतील. व ते रुग्णालयाच्या आवश्यकतेनुसार अपघात विभाग, वैद्यकीय अधिकारी, निवासी वैद्यकीय अधिकारी म्हणून काम पाहतील.

१६) आपसी सामंजस्य करारनामा झाल्याच्या दिनांकापासून रुग्णालयामध्ये सध्या कार्यरत असलेले सर्व गट-अ/ब संवर्गातील विशेषज्ञ यांच्या सेवा प्रतिनियुक्ती कालावधी संपुष्टात आल्यानंतर सार्वजनिक आरोग्य विभागाकडे परत करण्यात येतील. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाने प्रस्तावीत वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयातील विशेषज्ञांच्या

सेवा त्यांच्याकडे इतर वैद्यकीय महाविद्यालयामध्ये उपलब्ध असलेल्या विशेषज्ञांमधून उपलब्ध करुन देण्याची व्यवस्था करावी.

१७) गट-क व ग-ड कर्मचारी, यांच्या सेवा अधिष्ठाता, वैद्यकीय महाविद्यालय यांच्याकडे प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येतील. सदरची गट क व गट ड कर्मचाऱ्यांची आस्थापना (प्रतिनियुक्तीच्या कालावधीत) रुग्णालयाचे प्रशासकीय अधिकारी/मुख्य प्रशासकीय अधिकारी यांच्या थेट नियंत्रणाखाली तसेच अप्रत्यक्षपणे अधिष्ठाता यांच्या नियंत्रणाखाली येईल.

१८) जिल्हयातील आरोग्य व्यवस्था सांभाळण्यासाठी जिल्हा मुख्यालयी जिल्हा शल्य चिकित्सक यांच्या अधिनस्त कार्यालयाकरिता आवश्यक पदांचा तपशिल “प्रपत्र अ” येथे सादर केला असून, तो वैद्यकीय शिक्षण विभागास हस्तांतरीत करण्यात येणार नाही.

१९) वैद्यकीय शिक्षण विभागास हस्तांतरीत करावयाच्या पदांचा तपशिल “प्रपत्र ब” मध्ये सादर केला आहे.

२०) सार्वजनिक आरोग्य विभागाच्या विविध शासकीय योजनांतर्गत कंत्राटी तत्वावर नियुक्त करण्यात आलेले अधिकारी व कर्मचारी यांची सर्व पदे पूर्वीप्रमाणेच जिल्हा शल्य चिकित्सक यांचेकडे नियंत्रणाखाली राहतील.

२१) सामंजस्य करारानंतर जिल्हा शल्य चिकित्सक व नवनियुक्त अधिष्ठाता हे आपापसांत करार करतील.

-----------

**वैद्यकीय शिक्षण आणि औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्रमांक एमईडी-२०१३/ प्र.क्र.२०९/१३/शिक्षण-१, दिनांक ०९ जानेवारी, २०१९ सोबतचे**

**प्रपत्र अ**

**सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारीत ठेवावयाचे विभाग व पदे खालीलप्रमाणे**

| अ.क्र. | विभागाचे नाव | पदाचे नाव | पदांची सख्या | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १) | जिल्हा शल्य चिकित्सक कार्यालय | जिल्हा शल्य चिकित्सक | १ | जिल्हयातील उपजिल्हा व ग्रामीण रुग्णालय नियंत्रण |
| | | निवासी वैद्यकीय अधिकारी बाह्यसंपर्क | १ | वरीलप्रमाणे |
| | | सर्व गट अ विशेषज्ञ | | |
| | | लघुटंकलेखक | १ | |
| | | शिपाई | ३ | कार्यालयीन कामकाजासाठी |
| | | सार्वजनिक आरोग्य परिचारिका | १ | |
| २) | रुग्णालयीन प्रशिक्षण पथक | वैद्यकीय अधिकारी, वर्ग १ | १ | |
| | | सांख्यिकी सहाय्यक | १ | |
| | | शिपाई वर्ग ४ | १ | |
| ३) | प्रशासकीय विभाग | प्रशासकीय अधिकारी वर्ग २ | १ | कार्यालयीन आस्थापना विषयक बाबींसाठी |
| | | कार्यालयीन अधीक्षक वर्ग ३ | १ | कार्यालयीन कामकाज |
| | | वरिष्ठ लिपीक वर्ग ३ | १ | |
| | | कनिष्ठ लिपीक / टंकलखेक वर्ग ३ | १ | कार्यालयीन कामकाज |
| | | लेखापाल / सहा. अधिक्षक, वर्ग ३ | १ | कार्यालयीन कामकाज |
| | | सांख्यिकी पर्यवेक्षक | १ | कार्यालयीन कामकाज |
| | | भांडारपाल तथा वस्त्रपाल, वर्ग ३ | १ | |
| | | वाहन चालक | ३ | जिल्हा शल्य चिकित्सक १, निवासी वैद्यकीय अधिकारी १, औषधी साठी वाहन |
| ४) | औषध भांडार | औषधनिर्माण अधिकारी | २ | जिल्हयातील उपजिल्हा, ग्रामीण रुग्णालयातील राज्य व स्थानिक स्तरावरुन होणारी औषध वितरणासाठी |

------

**वैद्यकीय शिक्षण आणि औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्रमांक एमईडी-२०१३/ प्र.क्र.२०९/१३/शिक्षण-१, दिनांक ०९ जानेवारी, २०१९ सोबतचे**

**प्रपत्र ब**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाकडे हस्तांतरीत करावयाची विभाग व पदे**

| अ. क्र. | विभागाचे नांव | पदाचे नांव | पदांची सख्या | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १) | जिल्हा शल्य चिकित्सक कार्यालय | अतिरिक्त जिल्हा शल्य चिकित्सक | १ | |
| २) | प्रशासकीय विभाग | मुख्य प्रशासकीय अधिकारी, वर्ग १ | १ | |
| | | कार्यालयीन अधीक्षक, वर्ग ३ | १ | कार्यालयीन कामकाज |
| | | लघुटंकलेखक (मराठी), वर्ग ३ | १ | कार्यालयीन कामकाज |
| | | वरिष्ठ लिपीक वर्ग ३ | १ | कार्यालयीन कामकाज |
| | | कनिष्ठ लिपीक / टंकलखेक, वर्ग ३ | ३ | कार्यालयीन कामकाज |
| | | टंकलखेक, वर्ग ३ | १ | कार्यालयीन कामकाज |
| | | लेखापाल / सहा. अधिक्षक, वर्ग ३ | १ | कार्यालयीन कामकाज |
| | | भांडारपाल तथा वस्त्रपाल, वर्ग ३ | १ | |
| | | शिपाई, वर्ग ४ | २ | कार्यालयीन बाबींसाठी |
| ३) | ओ.पी.डी. | १) सर्व गट अ वैद्यकीय अधिकारी (फक्त एमबीबीएस अर्हता प्राप्त)<br>२) अधिसेविका<br>३) शुश्रुषा संवर्गातील सर्व परिसेविका<br>४) अधिपरिचारीका<br>५) सर्व तांत्रिक कर्मचारी गट क<br>६) सर्व गट ड कर्मचारी | | औषध निर्माण अधिकारी ७ पैकी ३ जिल्हा सामान्य रुग्णालयाच्या औषध भांडारसाठी आवश्यक |
| ४) | सर्व वार्डस | | | |
| ५) | रक्तपेढी | | | |
| ६) | प्रयोगशाळा | | | |
| ७) | क्ष-किरण व सोनोग्राफी | | | |
| ८) | भौतिक उपचार विभाग | | | |
| ९) | नवजात शिशू विभाग | | | |
| १०) | अतिदक्षता विभाग | | | |
| ११) | ट्रॉमाकेअर युनिट | | | |
| १२) | ऑपरेशन थिएटर | | | |
| १३) | डायलिसीस विभाग | | | |
| १४) | पोस्टमॉर्टम विभाग | | | |
| १५) | अपघात विभाग | | | |
| १६) | किचन (स्वयंपाक विभाग) | | | |

----------